**मत्स्यबीज केंद्र बांधकाम/दुरुस्ती/**
**<u>आधुनिकीकरण योजनेस मान्यता देणेबाबत .</u>**

**महाराष्ट्र शासन**
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्र.मत्स्यवि- २४१०/५२६/प्र.क्र.१०५/१०/पदुम-१३,
मंत्रालय विस्तार भवन मुंबई ४०० ०३२
दिनांकः- ७ ऑक्टोंबर,२०१०

**संदर्भ -** नियोजन विभागाचे पत्र क्र. जिवायो१००९/प्र.क्र.२१३/का.१४८१ दि.३०.१२.२००९

**प्रस्तावना -:**

गोडया पाण्यातील मत्स्यशेतीकरिता योग्य जातीच्या मत्स्यबीजाची वाढती गरज विचारात घेऊन मत्स्यबीजाचे राज्यातील उत्पादन वाढविण्यासाठी **"मत्स्यबीज उत्पादन केंद्राची स्थापना"** ही योजना १९६७-६८ मध्ये राज्यात सुरु करण्यात आली. मत्स्यबीजाच्या उत्पादनाकरिता नवीन मत्स्यबीज केंद्र स्थापन करणे, जुन्या चालू केंद्राच्या परिरक्षणासाठी दुरूस्त्या, इ.बांधकामे हाती घेण्यात येतात.

राज्यात गोडया पाण्यातील मत्स्योत्पादनासाठी उपलब्ध क्षेत्रात इष्टतम पातळीवर साठा करण्यासाठी ६० कोटी इतके मत्स्यबीज आवश्यक आहे.सातव्या पंचवार्षिक योजनेअखेरपर्यंत प्रतिवर्षी २२ कोटी इतके मत्स्यबीज आयात करण्यात येत असे. मत्स्यबीज उत्पादनाच्या क्षेत्रात स्वयंपूर्ण होण्यासाठी व आठव्या पंचवार्षिक योजनेअखेर पर्यत ६० कोटी इतके इष्टत्तम प्रमाणात लागणाऱ्या मत्स्यबीज उत्पादनासाठी या योजनेअंतर्गत ४२ मत्स्यबीज केंद्राची स्थापना करण्यात आली आहे.तसेच आधुनिक तंत्राचा वापर करुन मत्स्यबीज उत्पादन वाढविण्यासाठी २८ वर्तुळाकार उबवणी केंद्राची स्थापना करण्यात आली आहे.

जिल्हा वार्षिक योजना सर्वसाधारण संदर्भांत नियोजन विभागाच्या पत्र क्र.जिवायो -१००९/ प्र.क्र.२१३/का-१४८१, दिनांक ३० डिसेंबर २००९ अन्वये सन २०१०-११ मध्ये राबविण्यात येणार असलेल्या योजनांचे एकत्रिकरण करण्यात आले आहे. तसेच योजनांशी सबंधित शासन निर्णय निर्गमित करण्याचे निर्देश नियोजन विभागाने दिले आहेत. त्या अनुषंगाने **"मत्स्यबीज उत्पादन केंद्राची स्थापना"** या योजनेऐवजी **" मत्स्यबीज केंद्र बांधकाम/दुरुस्ती/आधुनिकीकरण"** ही योजना समाविष्ट करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णयः-</u>**

या शासन निर्णयान्वये **"मत्स्यबीज उत्पादन केंद्राची स्थापना"** या योजनेऐवजी **" मत्स्यबीज केंद्र बांधकाम/दुरुस्ती/आधुनिकीकरण"** ही नवीन योजना यापुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर योजनेअंतर्गत मत्स्यबीज केंद्र बांधकाम /सुधारणा/आधुनिकीकरण प्रस्तावित करताना पुढील बाबींचे पालन करण्यात यावे.

**अ) नवीन मत्स्यबीज केंद्र बांधकाम :-**

नवीन मत्स्यबीज केंद्र प्रस्तावित करताना तांत्रिकदृष्टया योग्य जागा उपलब्धता, पाणी उपलब्धता या बाबी विचारात घेऊन नवीन कर्मचारी वर्ग निर्माण न करता खाजगी सहभागातून नवीन मत्स्यबीज केंद्र प्रस्तावित करण्यात यावीत. याकरिता खालील प्रमाणे कार्यवाही करावी.

१.१) नवीन मत्स्यबीज केंद्र प्रस्तावित करताना, सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांनी जिल्हयात अस्तित्वात असलेली मत्स्यबीज केंद्रे, जिल्ह्याचे जलक्षेत्र, मच्छिमार सहकारी संस्था, मच्छिमार, मत्स्योत्पादन इत्यादी बाबी विचारात घेऊन प्रस्तावाची आवश्यकता स्पष्ट करावी. केंद्र बांधकामासाठी तांत्रिक दृष्टया योग्य शासकीय अथवा खाजगी जमीन उपलब्धता असल्यास जमिनीच्या महसूली कागदपत्रासह, जमिनीच्या महसूल नकाशात नियोजित केंद्र बांधकाम दर्शविण्यात यावे. खाजगी जमीन असल्यास जमिनीची किंमत (बाजार भावानुसार) प्रकल्प अहवालात समाविष्ट करावी. बारमाही पाणी पुरवठा व्यवस्थे बाबत खात्री करुन आवश्यक कागदपत्रे सोबत जोडावीत. प्रकल्पावर होणारा भांडवली खर्च, आवर्ती खर्च, वेतनावरील खर्च, प्रतिवर्षी मिळणारे मत्स्यबीज उत्पादन व त्यापासून मिळणारे उत्पन्न इत्यादी बाबत अहवाल जोडावा.

१.२) केंद्राची प्रस्तावित जागा तांत्रिकदृष्टया योग्य आहे किंवा कसे याबाबत (चाचणी खड्डे घेऊन पाणी टिकवून ठेवण्याची क्षमता तपासावी.) संबंधित सहायक आयुक्त मत्स्यव्यवसाय व प्रादेशिक उपआयुक्त मत्स्यव्यवसाय व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या संयुक्त भेटीचा अहवाल जोडावा.

१.३) केंद्र बांधकामाचे (Detail estimates) आराखडे व अंदाजपत्रके शासनाच्या संबंधित विभागाकडून तयार करुन घ्यावीत. केंद्र बांधकामासाठी तत्वत: मंजुरी व आवश्यक निधी दोन वर्षात उपलब्ध करुन देण्याबाबत जिल्हा नियोजन विकास परिषदेचा ठराव प्रस्तावासोबत सादर करावा.

१.४) परिपूर्ण प्रस्ताव प्रादेशिक उप आयुक्त मत्स्यव्यवसाय यांचे शिफारशीसह आयुक्त मत्स्यव्यवसाय, मुंबई यांचेकडे तांत्रिक मंजुरीस्तव सादर करण्यात यावा. आयुक्त मत्स्यव्यवसाय, मुंबई यांनी शासनाची मान्यता घेऊन तांत्रिक मंजुरी द्यावी आणि त्यानंतर प्रस्ताव प्रशासकीय मंजुरीसाठी संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडे सादर करावा.

१.५) प्रस्तावास प्रशासकीय मान्यता मिळाल्यानंतर त्यास बांधकाम विभागाच्या संबंधित सक्षम प्राधिकाऱ्याने तांत्रिक मंजुरी प्रदान करावी.

१.६) वरील योजनेचे वित्तीय अधिकार जिल्हाधिकारी यांचे राहतील.

१.७) नवीन मत्स्यबीज केंद्र प्रकल्पाकरिता कर्मचारी वर्ग नियुक्त करण्याऐवजी प्रकल्प खाजगी सहभागातून घेण्यात यावे . त्यासाठी खालीलप्रमाणे त्या जिल्हयाचे सहायक मत्स्यव्यवसाय आयुक्त यांनी कार्यवाही करावी.

१.७.१) केंद्र बांधकाम पूर्ण झाल्यावर सदर केंद्र २० वर्षासाठी सार्वजनिक खाजगी सहभागातून ठेक्याने देण्यासाठी प्रस्तावित करावे. त्यामध्ये प्रमुख अटी खालीलप्रमाणे समाविष्ट करण्यात याव्यात.

अ) ठेकेदाराने केंद्र क्षमतेप्रमाणे मत्स्यबीज उत्पादनाची हमी देणे बंधनकारक राहील.

ब) ठेकेदाराने शासन दरानुसार बीज विक्री करणे बंधनकारक राहील.

क) ठेकेदाराने विस्तारीकरण / केंद्र बांधकामात बदल/ स्थापत्तीय सुधारणा शासनाची पूर्ण परवानगी घेऊन करणे बंधनकारक राहील.

ड) ठेका कालावधीत केंद्र देखभाल व दुरुस्तीची संपूर्ण जबाबदारी ही ठेकेदाराची राहील.
इ) ठेकेदाराने ठेका मुदत पूर्ण झाल्यावर सुस्थितीत (चालू स्थितीत) केंद्र विभागाकडे हस्तांतरीत करणे बंधनकारक राहील.

१.७.२) प्रकल्प सार्वजनिक खाजगी सहभागातून कार्यान्वित करण्यासाठी प्रकल्पनिहाय शासन स्तरावरुन निर्णय घेण्यात येतील त्याकरिता संबंधित सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांनी केंद्र ठेक्याने देण्यासाठी प्रस्ताव योग्य मार्गाने शासनास मंजुरीस्तव सादर करावा. शासन मान्यतेनुसार वेळोवेळी निर्धारित केलेल्या अटी शर्तीनुसार करार करणे बंधनकारक राहील.

१.७.३) करार अटी व शर्तीची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांची राहील.

## २. अस्तित्वात असलेले मत्स्यबीज केंद्र दुरुस्ती/ आधुनिकीकरण

राज्यात सध्या अस्तित्वात असलेली मत्स्यबीज केंद्रे जिल्हा योजनेमधून दुरुस्ती, आधुनिकीकरण करण्याची कार्यवाही करावी, या अंतर्गत खालील सूचनानुसार कार्यवाही करण्यात यावी.

२.१) सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांनी सध्या कार्यान्वित असलेल्या केंद्राची दुरुस्ती, आधुनिकीकरण करताना पाणी पुरवठा व्यवस्था, हॅचरी, संगोपन, संवर्धन तसेच संचयन तलावांची बांधबंदिस्ती, नूतनीकरण, केंद्र विस्तार, प्रयोगशाळा निवासस्थाने इमारतीची दुरुस्ती याबाबी प्राधान्याने विचारात घ्याव्यात. तसेच आधुनिक तंत्रज्ञानाचा अवलंब करण्याचे दृष्टीकोनातून कामे प्रस्तावित करावीत. कामाचे आराखडे व अंदाजपत्रक सार्वजनिक बांधकाम विभागाकडून तयार करुन घ्यावेत व त्यानुसार निधी उपलब्धतेबाबत कार्यवाही करावी.

२.२) प्रस्तावित कामाचे आराखडे व अंदाजपत्रकावर संबंधित सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांनी प्रतिस्वाक्षरी करावी.

२.३) कामाचे आराखडे व अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता संबंधित जिल्हयाचे कार्यकारी अभियंता यांनी द्यावी.

२.४) प्रस्तावास वित्तिय व प्रशासकीय मान्यता नियोजन विभागाचा शासन निर्णय क्र.जिवायो-१००७/प्र.क्र.३९/का-१४४४, दिनांक १६ फेब्रुवारी २००८ अन्वये संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी देतील.

या योजनेवरील खर्च जिल्हास्तरीय योजनेच्या संबंधित अर्थशीर्षाखाली उपलब्ध होणाऱ्या तरतूदीतून करण्यात यावा.

सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.२६७/१४३१ दि. १८.९.२०१० अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र **२०१०१००८१८३८५५००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने

सही/-

(प.श.अहमद)

उपसचिव, महाराष्ट्र शासन

कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग.

प्रति,
आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व संबंधित कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग
सर्व प्रादेशिक उपायुक्त मत्स्यव्यवसाय,
सर्व सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय,
महालेखापाल (लेखा परिक्षा),(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई/२ नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,/निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
सर्व कोषागार अधिकारी.
प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
निवड नस्ती.